महाराष्ट्र ग्रामदान मंडळास सन २०१६-१७ चे सहायक अनुदान देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रामदा-२०१६/प्र.क्र.७६/ज-१अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: ३० मार्च, २०१७**

वाचा :-

१) **महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जीडीएन १०७४/१६०७/ग-२, दि.१६.५.१९७६.**
२) **महसूल व वन विभाग, शासन निर्णय व अधिसूचना क्र. जीडीएन ०८/२०१२/प्र.क्र.२९/ज-१, दि.१७.११.२०१२.**
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१६/२२२५/प्र.क्र.४०/ब-१, दि.०१.०४.२०१६.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६.
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१५/२२२५/प्र.क्र.९८/ब-१, दि.२१.०४.२०१६.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.ग्रामदा-२०१६/प्र.क्र.७६/ज-१अ, दि.२६.९.२०१६

शासन निर्णय :-

महाराष्ट्र ग्रामदान मंडळाची पुर्नस्थापना मा. श्री. आबा पांडुरंग कांबळे यांच्या अध्यक्षतेखाली शासन राजपत्रातील अधिसूचना क्र. जीडीएन ०८/२०१२/प्र.क्र.२९/ज-१, दि.१७.११.२०१२ अन्वये करण्यात आलेली आहे. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. जीडीएन-१०७४/१६०७/ग-२, दि.१६.५.१९७६ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला अनुदान देण्याबाबत अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत.

**०२.** महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात रु.५, ००, ०००/- (रुपये पाच लाख फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली होती. त्यानुसार संदर्भ क्र. ६ अन्वये सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पीत निधीपैकी रूपये ४,००,०००/- (रूपये चार लाख फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

**०३.** महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता आता, सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पीत निधीपैकी माहे फेब्रुवारी, २०१७ मध्ये आणखी रूपये ५०,०००/- (रूपये पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्याकरीता बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आली आहे. बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आलेली **रूपये ५०,०००/- (रूपये पन्नास हजार फक्त) इतकी** रक्कम ग्रामदान मंडळास वितरित करण्याकरीता या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**०४.** सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी **"सी-५-२२२५-अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-८०-सर्वसाधारण-८०००-इतर खर्च-(००)(०२)-महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहाय्यक अनुदान-(२२२५००६५), (दत्तमत) ३१-सहायक अनुदान (योजनेत्तर)"** या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा.

**०५.** अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांनी सन २०१६-१७ करीता वितरीत अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ घालून आणि लेखापरीक्षण करुन, लेखापरीक्षण अहवाल शासन सादर करावा.

**०६.** महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१६ च्या अनुषंगाने शासन वित्त विभागाने निर्गमित केलेल्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि.२०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्ठातील बाब.क्र.४ मध्ये नमूद केल्यानुसार प्रस्तुत जुन्या योजनेत्तर योजनेच्या स्वरूपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही. तसेच सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील अटी व शर्तीपैकी "उपयोगिता प्रमाणपत्र" या विषयीची अट या प्रकरणी लागू होत असल्याने महाराष्ट्र ग्रामदान मंडळाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील संदर्भाधीन क्र.६ येथे नमूद शासन निर्णयान्वये वितरीत केलेल्या निधीचे "उपयोगिता प्रमाणपत्र" विभागास सादर केलेले आहे.

**०७.** सदर शासन निर्णय निर्गमीत करताना शासन निर्णय वित्त विभाग क्र.१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि.१५.०५.२००९ अनुक्रमांक-२७, नियम क्रमांक- १४९ मधील अटींचे पालन केले आहे.

**०८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक **२०१७०३३०१६०६३८५७१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil S Kothekar

Digitally signed by Sunil S Kothekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c55205ca6d1113bfaec735bd2d1c5326d6b007c5cd3a46a6e4c4857e58ad2afe, cn=Sunil S Kothekar
Date: 2017.03.30 21:03:55 +05'30'

**(सुनिल कोठेकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव./वि.का.अ., मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

६. प्रधान सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-३२
७. सह सचिव (रोख शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. सह सचिव (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. उपसचिव (ज-१अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ८२, श्याम प्रभा, रमाबाई आंबेडकर नगर, मु.पो.नेहरोली, ता.वाडा,जि.पालघर-४२१३१२.
११.अवर सचिव (रोखशाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. (तीन प्रतींसह)
१२.कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.अर्थसंकल्प -४/व्यय-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.सचिव, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ८२, श्याम प्रभा, रमाबाई आंबेडकर नगर, मु.पो.नेहरोली, ता.वाडा, जि.पालघर-४२१३१२.
१५.निवडनस्ती (ज-१अ)